


महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग,
मंत्रालय विस्तार इमारत,
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४००० ३२.

दूरध्वनी क्र -०२२.२२०२५३३३
Email ID **desk16a.gad-mh@gov.in**

क्रमांक : दिव्यांग २०१५/प्र.क्र.१७१/१६-अ                                दिनांक : ०५ ऑक्टोबर, २०२१

प्रति,

सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,
मंत्रालयीन प्रशासकीय विभाग,
मंत्रालय, मुंबई.४०००३२

विषय : मा. उच्च न्यायालय, मुंबई येथील रिट याचिका स्टँप क्र. ६८१९/२०२१ व इतर प्रकरणी - दिव्यांगांसहित इतर अधिकारी/कर्मचारी यांची गट अ व गट ब मधील पदांवर पदोन्नतीमधील आरक्षणाबाबतची माहिती देणेबाबत.

दिव्यांगांना गट-अ व गट-ब मधील पदांवर पदोन्नतीमध्ये आरक्षण देण्याबाबत मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे रिट याचिका स्टँप क्र. ६८१९/२०२१ व इतर याचिका दाखल करण्यात आल्या आहेत. मा. उच्च न्यायालयामध्ये झालेल्या सुनावण्या व अंतरिम आदेश विचारात घेवून सामान्य प्रशासन विभागाने दि. ५.०७.२०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये दिव्यांग अधिकारी / कर्मचाऱ्यांना गट अ व गट ब मधील पदांवर पदोन्नतीमध्ये आरक्षण देण्याबाबतचा धोरणात्मक निर्णय मा. मंत्रिमंडळाच्या मान्यतेने घेतला आहे. दिव्यांग आरक्षणाच्या धोरणाची अंमलबजावणी प्रभावीपणे होते आहे किंवा कसे याबाबत मा. उच्च न्यायालयाकडून सुनावणीदरम्यान वेळोवेळी आढावा घेण्यात येत आहे.

मा. उच्च न्यायालयाने दि.१४.०९.२०२१ रोजीच्या आदेशान्वये सर्व विभागांना (**विशेषत: सार्वजनिक बांधकाम विभाग, शालेय शिक्षण विभाग, जलसंपदा विभाग आणि पशु संवर्धन विभाग**) गट अ व गट ब मधील पदांवर दिव्यांगांसहीत (PWD) इतर अधिकाऱ्यांची (Non-PWD) पदोन्नतीची कार्यवाही ३ आठवड्यांमध्ये करण्याचे निर्देश दिले होते. त्यानुसार सामान्य प्रशासन विभागांना मा. उच्च न्यायालयाच्या आदेशाची अंमलबजावणी करण्याबाबत पुन्हा सूचित केले. उक्त प्रकरणी मा. उच्च न्यायालयामध्ये दि. ५.१०.२०२१ रोजी सुनावणी होती. त्यानुषंगाने मा. महाधिवक्ता यांनी आज याबाबत आढावा घेतला त्यावेळी काही विभागांनी मा. उच्च न्यायालयाच्या आदेशाची अंमलबजावणी होण्याच्या अनुषंगाने पुरेसे प्रयत्न न केल्याने पुन्हा विनंती करण्यात येते की, दि. ५.०७.२०२१ रोजी दिव्यांग आरक्षण लागू केल्यापासून गट अ व गट ब पदावरील दिव्यांगांसहीत (PWD) इतर अधिकाऱ्यांची (Non-PWD) पदोन्नतीबाबतची सद्यस्थिती माहिती सोबतच्या

विवरणपत्रानुसार मा. महाधिवक्ता यांना १० प्रतींत दि. ६.१०.२०२१ रोजी सायंकाळी ५.०० वाजेपर्यंत **तात्काळ** सादर करावी. सदर अहवालाची एक प्रत या विभागास वर नमूद ई-मेल वर पाठविण्यात यावी.

सदर पत्र महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्यांचा संगणक संकेतांक २०२११००५१७०९००२७०७ असा आहे.

सोबत :- वरीलप्रमाणे.

आपला,

MADHUKAR SARJERAO GHOGARE

Digitally signed by MADHUKAR SARJERAO GHOGARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=539635e59a0a994a979279d79261fa9f3f9070d1a37dfe29dbc4be5d1c827801, pseudonym=AC3147DBADAD7F4C4CB2DE528E143189B6FA5D3D, serialNumber=344B951816C517FCEA0454E21D7FDE25CC87830C180514DAFD445EC2BC6B50BF, cn=MADHUKAR SARJERAO GHOGARE
Date: 2021.10.05 17:11:29 +05'30'

**( म. स. घोगरे )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे दाखल रिट याचिका स्टँप क्र. ६८१९/२०२१ व इतर प्रकरणी

मा. न्यायालयास सादर करावयच्या माहितीचे विवरणपत्र

STATUS REPORT OF PROMOTION ORDERS IMPLEMENTION GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT G.R. 5.07.2021 AS ON ----

Department Name -------------------

| Government Order dated (पदोन्नती आदेश दिनांक) | Promotion from the post (मूळ पद) | Promotion to the post (पदोन्नतीचे पद) | Non P.W.D. (दिव्यांग रहित) | P.W.D. (Person with Disabilites) (दिव्यांग) | Total Posts एकूण |
|---|---|---|---|---|---|
| 1 | 2 | 3 | 4 | 5 | 6 |
| | | | | | |
| | | | | | |

Signature

(Deputy Secretary / Joint Secretary)